**कोषागारातून रोख देय अनुदान**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण)
अंतर्गत अनुसुचित जाती उपयोजना
घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित
कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदान
वितरण करणेबाबत.

**(लेखाशीर्ष २२१५ ९८२६)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१९/प्र.क्र.२५१/पापु-१६

७ वा मजला, जी.टी.रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०८ नोव्हेंबर,२०१९.

**वाचा:**

**केंद्र शासनाचे मंजूरी आदेश: क्र.S-१८०१३/२/२०१४-O/० Dir (SBN), दिनांक १/४/२०१९.**

**प्रस्तावना :**

उपरोक्त वाचा येथील केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता मंत्रालयाच्या मंजूरी आदेशान्वये राज्य शासनास केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत अनुसुचित जाती घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदानाकरिता एकूण रुपये ३१९१.६८लक्ष एवढा निधी वितरित करण्यात आलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाने कळविले आहे. सदर उपलब्ध निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) योजनेंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता अनुसुचित जाती घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदान एकूण रुपये ३१९१.६८ लक्ष (रूपये एकतीस कोटी, एक्यान्नव लक्ष, अडुसष्ट हजार फक्त) इतका निधी वितरणासाठी अर्थसंकल्पिय प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या सदर रुपये ३१९१.६८ लक्ष (रूपये एकतीस कोटी, एक्यान्नव लक्ष, अडुसष्ट हजार फक्त) इतका निधी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनस्त ठेवण्यास या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदान हे सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

०२. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनस्त ठेवण्यात आलेली रूपये ३१९१.६८ लक्ष (रूपये एकतीस कोटी, एक्यान्नव लक्ष, अडुसष्ट हजार फक्त) एवढी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रूपये ३१९१.६८ लक्ष (रूपये एकतीस कोटी, एक्यान्नव लक्ष, अडुसष्ट हजार फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्रीम.सुनिता केसकर), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (श्री. अभय महाजन), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम रूपये ३१९१.६८ लक्ष (रूपये एकतीस कोटी, एक्यान्नव लक्ष, अडुसष्ट हजार फक्त) इतकी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), (श्रीम. सुनिता केसकर ),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून स्वतंत्र धनादेशान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.”

०३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,नवी मुंबई यांनी या शासन निर्णयाव्दारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) सदर निधी खर्च करण्याबाबत केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सुचनांमधील तरतूदींनुसार जिल्हा परिषदांना वितरीत करण्याबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

इ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/अर्थ -३, दिनांक १ एप्रिल,२०१९ व क्रमांक अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक ८ जूलै २०१९ मधील अटी व शर्थीचे काटेकोरपणे पालन करुन आवश्यक बाबींची पूर्तता करुन कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

४. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, (०२) ग्रामसफाई कार्यक्रम, (०२) (९) निर्मल भारत अभियानांतर्गत

शौचालयाचे बांधकाम,केंद्र पुरस्कृत योजना (अनुसूचित जाती उपयोजना) (केंद्र हिस्सा) (२२१५ ९८२६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) " या लेखाशीर्षाखाली घालावा.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९ व क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दिनांक ०८ जुलै, २०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल,२०१९ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीची तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

५. उपरोक्त रूपये ३१९१.६८ लक्ष (रूपये एकतीस कोटी, एक्यान्नव लक्ष, अडुसष्ट हजार फक्त) एवढा निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबाबत वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून क्र.अनौ.क्र.२३२/अर्थोपाय , दि.२४/०६/२०१९ कळविण्यात आलेल आहे. सदर निधी अनुसुचित जाती व नवबौध्द प्रवर्गासाठी वित्त विभागाच्या शासन निर्णय/परिपत्रकाच्या अधिन राहून खर्च करण्याबाबत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून क्र.अनौ.क्र.७५४/अर्थसंकल्प, दि.१९/०७/२०१९ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०८११५५२३१५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2019.11.08 17:11:47 +05'30'

**(स्मि.स.राणे)**

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.राज्यमंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४. विभागीय आयुक्त, सर्व.

५. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता).

६. उप सचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

७. उपायुक्त, विकास/आस्थापना, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.

८. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.

९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

११. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.

१२.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.

१३. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा. व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.

१४.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

१५.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

१६. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (विघयो), मंत्रालय, मुंबई.

१७. नियोजन विभाग, (का.क्र.१४४३), मंत्रालय, मुंबई.

१८. वित्त विभाग, (व्यय-३), मंत्रालय, मुंबई.

१९. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२०. निवड नस्ती, कार्यासन पापु-१६, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.